**सन २०१९-२० करिता भारतीय संविधान २७५(१) अंतर्गत मंजूर "Establishment and operation of 15 semi-automated central kitchens" या योजनेच्या मार्गदर्शक तत्वांना मंजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन पूरक पत्र क्रमांकः केंद्रीय-२०१९/प्र.क्र.३५/का-१९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ०३/०१/२०२०

संदर्भ-

१. आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय क्र.केंद्रीय-२०१८/प्र.क्र.८५/का.१९, दिनांक १९/१०/२०१८
२. आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय क्र.केंद्रीय-२०१९/प्र.क्र.३५/का.१९, दिनांक १३/०९/२०१९
३. आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय क्र.केंद्रीय-२०१९/प्र.क्र.३६/का.१९, दिनांक १८/०९/२०१९
४. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,डहाणू यांचे पत्र क्र.७९६०, दि.०६.१२.२०१९
५. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धारणी यांचे पत्र क्र.५७०३, दि.०६.१२.२०१९

प्रस्तावना-

उपरोक्त शासन निर्णयान्वये सन २०१९-२० व २०२०-२१ करिता भारतीय संविधान २७५(१) अंतर्गत मंजूर "**Establishment and operation of 15 semi-automated central kitchens**" या योजनेच्या मार्गदर्शक तत्वांना मंजूरी देण्यात आलेली असून सदर योजनेंतर्गत ए.आ.वि.प्रकल्प कार्यालय तळोदा (५),नाशिक (३) ,डहाणू (२),किनवट (३) व यावल (२) यांच्या कार्यक्षेत्रामध्ये सेमी Automated मध्यवर्ती स्वयंपाक गृह उभारण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. प्रस्तुत योजनेची अंमलबजावणी स्त्री-शक्ती या संस्थेद्वारे करण्यात येत आहे. आता ए.आ.वि.प्रकल्प कार्यालय,डहाणू यांच्या कार्यक्षेत्रामध्ये उभारण्यात येणाऱ्या २ सेमी Automated मध्यवर्ती स्वयंपाक गृहाची उभारणी करण्याची आवश्यकता नसल्याचे संदर्भाधीन ०४ येथील पत्रान्वये प्रकल्प अधिकारी,ए.आ.वि.प्रकल्प,डहाणू यांनी कळविले आहे. तसेच संदर्भाधीन ०५ येथील पत्रान्वये प्रकल्प अधिकारी,ए.आ.वि.प्रकल्प,धारणी यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रामध्ये ३ सेमी Automated मध्यवर्ती स्वयंपाक गृहाची उभारणी करण्याची आवश्यकता असल्याबाबत कळविले आहे.

२. प्रकल्प कार्यलय,नाशिक व डहाणू यांच्या अधिनस्त असलेल्या बहुतांश शाळा मध्यवर्ती स्वयंपाक गृहाच्या लाभक्षेत्रात समाविष्ट आहेत.तर मेळघाट क्षेत्रात परिपूर्ण आहार उपलब्ध करून देणे आवश्यक आहे.सबब, आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय दिनांक १३/०९/२०१९ मधील परिशिष्ट १ मधील अ.क्र-२ (योजनेचे प्रस्तावित लाभक्षेत्र) मध्ये लाभक्षेत्र डहाणू मधील २ व नाशिक मधील एक सेमी

Automated स्वयंपाक गृहांचे स्थलांतर करून एकूण ३ सेमी Automated मध्यवर्ती स्वयंपाक गृहाची उभारणी प्रकल्प अधिकारी, ए.आ.वि.प्रकल्प, धारणी यांच्या कार्यक्षेत्रात करण्यास मंजुरी देण्यात येत असून वरील वाचा येथील क्र.१ च्या शासन निर्णयान्वये निश्चित केलेली कार्यपद्धतीच या प्रकरणी लागू राहील.

३. तसेच केंद्रीय निधीतून मंजूर सर्व मध्यवर्ती स्वयंपाकगृह व सेमी Automated स्वयंपाक गृहसाठी निस्सारण सुविधा (drainage facility) निर्माण करण्याकरिता स्त्री शक्ती संस्थेने तांत्रिक सल्लागारामार्फत आराखडे तयार करून सबंधित प्रकल्प अधिकारी व बांधकाम कक्षाचे कार्यकारी अभियंता यांच्या संयुक्त बैठकीमध्ये सादर करून, मंजूर करून त्याची अंमलबजावणी करावी व यासाठी होणारा खर्च हा स्त्री शक्ती संस्थेने करावा व कामाच्या प्रगतीनुसार सबंधित प्रकल्प अधिकारी यांनी सदर खर्चाची पूर्तता जिल्हा वार्षिक उपयोजना क्रमांक TY ३०००८/१३ अंतर्गत प्राप्त निधी वा नाविन्यपूर्ण योजनेतून करण्यात यावी.

वरील शासन पूरकपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२००१०४११५९०९६५२४ असा आहे. हे पूरकपत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Waje Prakash Vijay

Digitally signed by Waje Prakash Vijay
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1b4b695a8c26d140fc5c049d281eedbf23beed9a89ad7526416132cf28f14776, serialNumber=400892e5e82479e4f3c8cf46538dc917b7071e979796d37178d3b709e19155ab, cn=Waje Prakash Vijay
Date: 2020.01.08 17:16:35 +05'30'

**( प्रकाश वाजे )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

१) मा.मंत्री आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय,मुंबई
२) मा.राज्यमंत्री आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. प्रधान सचिव,आदिवासी विकास, यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई
४) आयुक्त,आदिवासी विकास,महाराष्ट्र राज्य,नाशिक.
५) उपसचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) अपर आयुक्त, आदिवासी विकास नाशिक,ठाणे,अमरावती
७) प्रकल्प अधिकारी एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा,यावल, किनवट, नाशिक,डहाणू व धारणी
८) संचालक, स्त्री शक्ती संस्था मुंबई
९) निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.